**मुख्य अभियंता (स्थापत्य) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्या / पदस्थापना.**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक बांधकाम विभाग

**शासन आदेश क्रमांकः टीएफएस-१३२३/प्र.क्र. ६४/सेवा-१,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १३ मार्च, २०२३.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४) व ४ (५) मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने, सार्वजनिक बांधकाम विभागातील मुख्य अभियंता (स्थापत्य) या संवर्गातील खालील तक्त्यात नमुद अधिकाऱ्यांची बदली, त्यांच्या विनंती नुसार तसेच सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय कारणास्तव त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्र. ४ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्याची पदस्थापना | बदली नंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| *१* | *२* | *३* | *४* |
| १. | श्री. दिनेश ना. नंदनवार | नागपूर महानगरपालिका, नागपूर | सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर (श्री. दशपुते यांच्या पदोन्नतीने रिक्त होणाऱ्या पदी) |
| २. | श्री. राजीव ता. गायकवाड | महाव्यवस्थापक (स्थापत्य), मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि., मुंबई | नागपूर महानगरपालिका, नागपूर (श्री. नंदनवार यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदी) |

२. संबंधित अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन पदाचा कार्यभार त्वरित स्वीकारावा व आपला पदग्रहण अहवाल शासनास विनाविलंब सादर करावा. त्यांनी अनधिकृतरित्या गैरहजर राहू नये अन्यथा त्यांची अनुपस्थिती ही अनधिकृत गैरहजेरी म्हणून समजण्यात येईल व विनावेतन करण्यात येईल. तसेच त्यांच्या सेवेत खंड पडण्याची शक्यता नाकारता येत नाही याची जाणीव संबंधितांना करुन देण्यात येत आहे. तसेच, सदर अधिकाऱ्यांचे यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ कडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

३. संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी पदमुक्त व पदमोचक अधिकाऱ्यांनी अनुक्रमे कार्यभार सोडल्याचा तसेच कार्यभार स्वीकारल्याचा दिनांक त्वरित शासनास doser1.pwd@maharashtra.gov.in या ई-मेल पत्त्यावर कळवावा.

४. संबंधित अधिकाऱ्यांची बदली त्यांच्या विनंतीनुसार करण्यात येत असल्याने त्यांना नियमानुसार पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहणार नाही.

५. वरील तक्त्यातील श्री. गायकवाड यांना प्रतिनियुक्तीच्या पदावर पदस्थापना देण्यात आली असून, सदर पदस्थापना ही महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ च्या परिशिष्ट दोन मध्ये विहित केलेल्या प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्तींच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

६. संबंधित अधिकाऱ्यांनी नवीन नियुक्तीच्या पदाचा पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास तसेच संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप, पुणे यांना कळवावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३१३१८१८३१५११८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GANGADHAR
MAHAJAN GAIKWAD

Digitally signed by GANGADHAR MAHAJAN GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=0d38ef6405f5cae15731340f134ce56f50e939ba034b962c317c33ce102270d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5EEEAD19A0EF3D2434AFCCB36079E80E7EDE5A45017EC3297470E90AE602404B, cn=GANGADHAR MAHAJAN GAIKWAD
Date: 2023.03.13 18:23:08 +05'30'

**(गंगाधर म. गायकवाड)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा. मुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा. उप मुख्य मंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. प्रधान सचिव (नवि-१/नवि-२), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. आयुक्त, नगापूर महानगरपालिका, नागपूर,
५. व्यवस्थापकीय संचालक, मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि., मुंबई,
६. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई/ कोकण/ पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ नांदेड /अमरावती/ नागपूर/ राष्ट्रीय महामार्ग, नवी मुंबई,
७. मुख्य अभियंता (विद्युत), मुंबई,
८. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
९. संचालक, उपवने व उद्याने, मुंबई,
१०. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप पुणे,
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा ) महाराष्ट्र राज्य-२, मुंबई,
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर,
१३. श्री. दिनेश ना. नदंनवार, मुख्य अभियंता, नागपूर महानगरपालिका, नागपूर,
१४. श्री. राजीव ता. गायकवाड, मुख्य अभियंता - द्वारा: मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई,
१५. मा. मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१६. अपर मुख्य सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
१७. सचिव ( रस्ते / बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
१८. सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९. कक्ष अधिकारी ( आस्था-१, आस्था-२, आस्था-३, रोखशाखा, सेवा-६, संगणक कक्ष), मंत्रालय, मुंबई,
२०. निवडनस्ती.